राज्य माहिती आयोगाच्या विविध खंडपीठात
प्रतिनियुक्तीने नियुक्ती

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एएससी १५१७/प्र.क्र.१३७/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २८ ऑगस्ट, २०१७

**शासन आदेश**

मंत्रालयीन विभागातील खाली नमूद केलेल्या कर्मचाऱ्यांच्या सेवा राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र, नवीन प्रशासकीय इमारत, १३ वा मजला, मुंबई-४०० ०३२ यांच्या अधिपत्याखालील राज्य माहिती आयोगाच्या खाली नमूद केलेल्या कार्यालयांमध्ये प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नांव | पदनाम | सध्याचा विभाग | प्रतिनियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री तु.सु.शिंदे | सहायक कक्ष अधिकारी | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | राज्य माहिती आयोग, नाशिक खंडपीठ |
| २. | श्रीमती कि.अ. निकम | सहायक कक्ष अधिकारी | जलसंपदा विभाग | राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ |
| ३. | श्री सु.शं.शिंदे | सहायक कक्ष अधिकारी | सार्वजनिक बांधकाम विभाग | राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ |

२. उपरोक्त नमूद कर्मचाऱ्यांची, सेवा त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या राज्य माहिती आयोगाच्या कार्यालयातील, **सहायक कक्ष अधिकारी** या पदावर प्रथमत: **दोन वर्षाच्या कालावधीसाठी** खालील अटींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

(अ) ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला संबंधित कर्मचारी आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारील त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/संवर्ग नियंत्रण अधिकारी/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्याला मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्याने मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्याला मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

३. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा...इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुदी विचारात घेऊन सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, जलसंपदा विभाग व सार्वजनिक बांधकाम विभागाने प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती याबाबत सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन ६ यांच्याशी सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

४. उपरोक्त परिच्छेद १ मधील अनुक्रमांक १ येथील कर्मचाऱ्यांच्या बाबतीत सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, अनुक्रमांक २ येथील कर्मचाऱ्यांच्या बाबतीत जलसंपदा विभाग व अनुक्रमांक ३ येथील कर्मचाऱ्याच्या बाबतीत सार्वजनिक बांधकाम विभाग हे त्यांचे प्रशासकीय विभाग असल्यामुळे या कर्मचाऱ्यांच्या प्रशासकीय बाबी संबंधित प्रशासकीय विभाग व सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन ६ यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

५. संबंधित कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी विभागाने तत्काळ कार्यमुक्त करावे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२८१५५३५०८६०७ असा आहे. हा परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.08.28 15:44:23 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**संबंधित कर्मचारी (विभागामार्फत)**

**प्रत,**

१. सचिव, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र, नवीन प्रशासकीय इमारत, १३ वा मजला, मंत्रालय, मुंबई-४०००३२

२. उप सचिव, राज्य माहिती आयोग, नाशिक खंडपीठ, पिनकॉल मॉल, चौथा मजला, त्र्यंबक नाका सिग्नल जवळ, आग्रा रोड, नाशिक-४२२०२२

३. उप सचिव, राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ, कोकण भवन, ५ वा मजला, सी.बी.डी.,-बेलापूर, नवी मुंबई-४००६१४

४. सह/उप सचिव (आस्थापना), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग/जलसंपदा विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२

त्यांना विनंती करण्यात येते की, सदर कर्मचाऱ्यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने राज्य माहिती आयोगाच्या कार्यालयांना उपलब्ध करुन देताना त्या संबंधिच्या अटी व शर्ती संदर्भात त्यांनी सा.प्र.वि./का.६ यांच्याशी संपर्क करावा. तसेच अटी व शर्ती ठरविल्यानंतर म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा..इ.) नियम, १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती नमूद करुनच प्रतिनियुक्तीचे आदेश काढणे आवश्यक आहे. त्यानुसार काढलेल्या आदेशाची प्रत या कार्यासनाकडे तत्काळ पाठविण्यात यावी.

५. उप सचिव (कार्यासन क्र.६), सामान्य प्रशासन विभाग, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयसमोर, मुंबई ४०० ०३२.

त्यांना विनंती करण्यात येते की, सदर कर्मचाऱ्यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने त्वरेने उपलब्ध होतील याबाबत त्यांनी संबंधित विभागाकडे पाठपुरावा करावा.

६. साप्रवि/१४-अ (संग्रहार्थ)